**भारती विद्यापीठ पोलीस ठाणे येथे दाखल असलेला गु.र.क्र. ३२७/२०१४ चे प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.श्री.प्रताप परदेशी यांना शासकीय दराने व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०८१६/प्र.क्र. २१८ /पोल-१०**

२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०६.०२.२०१७.

**संदर्भ** शासन अधिसुचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी ३११६/यु.ओ.आर.७०/डी-१४, दिनांक २२ सप्टेंबर, २०१६.

**शासन निर्णय:**

भारती विद्यापीठ पोलीस ठाणे येथे दाखल असलेला गु.र.क्र. ३२७/२०१४ ( बाल लैंगीक अत्याचार प्रतिबंध अधिनियम १९८९ स्पेशल केस नं.३५/२०१५) चे प्रकरणी उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणी शासनाच्या वतीने कामकाज पहाण्यासाठी ॲड. श्री. प्रताप परदेशी यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक २२ सप्टेंबर, २०१६ च्या अधिसुनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड. श्री. प्रताप परदेशी यांना शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांक मिटींग २०११/(२४९)/डी-१४, दिनांक १५.०२.२०१४ मधील Statement "E" मधील (II) नुसार शासकीय दराने फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्यांकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५३६/१६/व्यय-७, दिनांक ०९.१२.२०१६ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०६१३३५३३३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25b1cd893dfd4dc594def1c4642465ecdafbdae899f879d9b4603fe37cfb3598, cn=Arun Vishnupant Joshi
Date: 2017.02.06 13:37:35 +05'30'

(अ.वि.जोशी)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, पुणे शहर, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. ॲड. श्री.प्रताप परदेशी, (पोलीस आयुक्त, पुणे शहर,पुणे यांचे मार्फत).
७. विधी व न्याय विभाग (का १४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).